सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: शिवृत्ती २०२४/प्र.क्र.०८/शिक्षण-२**

मोती महल,२ रा मजला १९५,जे.टाटा रोड,
चर्चगेट, मुंबई ४०० ०२०.
दिनांक - २८ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ :-** १) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र. अर्थसं - २०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र. अर्थसं - २०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.
३) संचालक,इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय,पुणे यांचे पत्र.क्र. इ.मा.ब.क.सं. /शिक्षण/प्री- मॅट्रिक/शिवृत्ती योजना - निधीमागणी/ २०२४-२५/पुणे, दि३०.०९.२०२४
४) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्र.शिवृत्ती २०२४/प्र.क्र.०८/ शिक्षण-२,दि.१०.१२.२०२४
५) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन शुध्दिपत्रक क्र.शिवृत्ती २०२४/प्र.क्र.०८/ शिक्षण-२,दि.२६.१२.२०२४
६) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन शुध्दिपत्रक क्र.शिवृत्ती २०२४/प्र.क्र.०८/ शिक्षण-२,दि.१७.०१.२०२५
७) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्र.शिवृत्ती २०२४/प्र.क्र.०८/ शिक्षण-२,दि.२३.०१.२०२५
८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं - २०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२.०२.२०२५.

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाच्या दि. २५ जुलै, २०२४ च्या परिपत्रकान्वये वित्त विभागाने वित्तीय वर्ष २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२४ अखेर ) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरणासाठी उपलब्ध करून दिला आहे. प्रत्यक्षात बीम्स प्रणालीवर ९० % मर्यादेत निधी उपलब्ध होता. त्यापैकी ७०% निधी संदर्भ क्र.४ दि.१०.१२.२०२४ आणि २०% निधी संदर्भ क्र.७ दि.२३.०१.२०२५ अन्वये वितरीत केला आहे.

सद्यस्थितीत सन २०२४-२५ चे सुधारित अंदाज निश्चित करण्याची कार्यवाही सुरु असून सुधारित अंदाज निश्चित होईपर्यंतच्या कालावधीसाठी विभागास आवश्यक असणाऱ्या खर्चासाठी निधीची गरज लक्षात घेता निधी वितरणाची मर्यादा निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार वित्त विभागाच्या संदर्भ क्र.८ दिनांक १२.०२.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये शिष्यवृत्ती योजनेंतर्गत १०० % निधी वितरणास सहमती देण्यात आली आहे. त्यानुसार वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर एकूण

अर्थसंकल्पित तरतूदीपैकी उर्वरित १०% तरतूद वितरणासाठी विभागांना उपलब्ध करुन दिली आहे. सबब, अद्यापपावेतो बीम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध असलेल्या मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती योजनेककरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूद रु.५५,२५,९९,०००/- (अक्षरी रक्कम रु.पंचावन्न कोटी पंचवीस लक्ष नव्व्याण्णव हजार फक्त) एकूण (१००%) निधीपैकी उर्वरित १०% निधी रु.५,५२,५९,९००/- (अक्षरी रक्कम रुपये पाच कोटी बावन्न लक्ष एकोणसाठ हजार नऊशे फक्त) इतकी रक्कम संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय,पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ दि.२५.०७.२०२४ च्या शासन परिपत्रकान्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती योजनेकरिता अर्थसंकल्पित केलेल्या एकूण तरतूद रु.५५,२५,९९,०००/- (अक्षरी रक्कम रु.पंचावन्न कोटी पंचवीस लक्ष नव्व्याण्णव हजार फक्त) पैकी वित्त विभागामार्फत बिम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधी पैकी रु.३८,६८,१९,३००/- (अक्षरी रक्कम रु. अडतीस कोटी अडुसष्ठ लक्ष एकोणीस हजार तीनशे फक्त) व रु.११,०५,१९,८००/- (अक्षरी रक्कम रु. अकरा कोटी पाच लक्ष एकोणीस हजार आठशे फक्त) अशी अर्थसंकल्पित निधी पैकी ९०% एकूण रक्कम रु.४९,७३,३९,१००/- (अक्षरी रक्कम रु. एकोनपन्नास कोटी त्र्याहत्तर लक्ष एकोणचाळीस हजार शंभर फक्त) अनुक्रमे संदर्भीय शासन निर्णय क्र.४ व संदर्भीय क्र.७ अन्वये संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांस वितरीत करण्यात आला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.८ दिनांक १२.०२.२०२५ च्या शासन परिपत्रकान्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उदिष्ट क्र.३४- शिष्यवृत्ती/विद्यावेतन या करिता अर्थसंकल्पित तरतूदीपैकी १०० % निधी वितरणास सहमती देण्यात आली आहे. त्यानुसार वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर एकूण अर्थसंकल्पित तरतूदीपैकी उर्वरित १०% तरतूद वितरणासाठी विभागांना उपलब्ध करुन दिली आहे. सबब, मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती योजनेकरिता अद्यापपावेतो बीम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध असलेल्या एकूण (१००%) निधीपैकी उर्वरित १०% निधी रु.५,५२,५९,९००/- (अक्षरी रक्कम रुपये पाच कोटी बावन्न लक्ष एकोणसाठ हजार नऊशे फक्त) इतकी रक्कम खालील नमूद लेखाशिर्षनिहाय संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय,पुणे यांना वितरीत करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे -:

**(रु.हजारात)**

| अ. क्र | योजनेचे नाव | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीय तरतूद | बिम्स प्रणालीवर उपलब्ध निधी (१००%) | दि.१०.१२.२०२४ अन्वये वितरीत ७० % केलेला निधी | दि.२३.०१.२०२५ अन्वये वितरीत २० % केलेला निधी | वितरीत करावयाचा निधी (५-६-७=८) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | माध्यमिक शाळांमध्ये शिकणा-या विजाभज आणि विमाप्र प्रवर्गातील ५ वी ते १० वी च्या विदयार्थ्यांसाठी गुणवत्तापूर्व शिष्यवृत्ती विद्यार्थी **(केवळ मुंबई विभागासाठी)** | २२२५ E ८९३ | १६०.००० | १६०.००० | ११२.००० | ३२.००० | १६.००० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | सैनिक शाळेत प्रशिक्षण घेणा-या विजाभज व विमाप्र विद्यार्थ्या साठी निर्वाह भत्ता योजना | २२२५ E ९२८ | ३००००.००० | ३००००.००० | २१०००.००० | ६०००.००० | ३०००.००० |
| ३ | इयत्ता ८ वी ते १० वी मध्ये शिकणा-या विजाभज व विमाप्र प्रवर्गातील विद्यार्थीनींकरिता सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती | २२२५ E ९८२ | १५००००.००० | १५००००.००० | १०५०००.००० | ३००००.००० | १५०००.००० |
| ४ | इयत्ता ५ वी ते ७ वी मध्ये शिकणाऱ्या इतर मागास प्रवर्गातील विद्यार्थीनींकरिता सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती | २२२५ F२४५ | १५००००.००० | १५००००.००० | १०५०००.००० | ३००००.००० | १५०००.००० |
| ५ | इयत्ता ८ वी ते १० वी मध्ये शिकणा-या इतर मागास प्रवर्गातील विद्यार्थीनींकरिता सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती | २२२५ F२७२ | १५००००.००० | १५००००.००० | १०५०००.००० | ३००००.००० | १५०००.००० |
| ६ | अ) माध्यमिक शाळांमध्ये शिकणाऱ्या विजाभज व विमाप्र प्रवर्गातील ५ वी ते १० वी च्या विद्यार्थ्यांसाठी गुणवत्तापूर्व शिष्यवृत्ती **(जिल्हा परिषद)** | २२२५ F०११ | ७२४३९.००० | ७२४३९.००० | ५०७०७.३०० | १४४८७.८०० | ७२४३.९०० |
| | ब) इ. ५ वी ते ७ वी मध्ये श्किणा-या विजाभज व विमाप्र प्रवर्गातील मुलींकरिता सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती | | | | | | |
| | क)माध्यमिक शाळांमध्ये शिकणा-या विजाभज व विमाप्र प्रवर्गातील विदयार्थ्यांसाठी शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्क प्रदान करणे. | | | | | | |
| **एकूण** | | | **५५२५९९.०००** | **५५२५९९.०००** | **३८६८१९.३००** | **११०५१९.८००** | **५५२५९.९००** |

३. सदरहू योजनांकरीता संबंधित जिल्ह्याचे सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण जिल्हा कार्यालय हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, पुणे हे नियंत्रक अधिकारी राहतील. नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनातून खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे खर्चाचे विवरण (जिल्हानिहाय खर्च व लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

४. उपरोक्त योजनेंतर्गत चालू आर्थिक वर्षातील खर्चाचे तसेच मागील वर्षातील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांनी तपासण्याच्या आधीन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. तसेच वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका यानुसार वेळेवेळी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकातील अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करून कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

५. नियंत्रक अधिकारी यांनी निधी खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकामधील अटींची पूर्तता झाली असल्याची खातरजमा करून निधी वितरीत करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. २५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२८१६०९१८०७३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIVEDITA LOKESH WARULE

Digitally signed by NIVEDITA LOKESH WARULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=3ef8c2c4c081462a26dea72c10274caaa77d92363242a1bff9454421d88652f3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8A41558A05225BDD429CBDFA69D2436A1EA3BC5173099C377F9F8B13C78A9D57, cn=NIVEDITA LOKESH WARULE
Date: 2025.02.28 16:10:36 +05'30'

**( नि.लो.वारूळे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव.
२. मा. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
६. सर्व प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग.
७. सर्व सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा कार्यालय.
८. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवडनस्ती ( शिक्षण -२)